**निरुपयोगी, दुरुस्ती न होण्याजोगी वाहने आणि यंत्रसामुग्री यांचे निर्लेखन करण्यासाठी लिलाव पध्दती ठरविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
ग्राम विकास व जलसंधारण विभाग
**शासन परिपत्रक क्रमांक : झेडपीए १००९/१३८१/प्र.क्र.१४/पंरा-१**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
**दिनांक : २२ जुलै, २००९.**

**वाचा:-** शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्र.जेईपी १०९६/सीआर ३५८८/२६, दिनांक २२ नोव्हेंबर,२०००.

**शासन परिपत्रक :-**

ग्राम विकास व जलसंधारण विभागाने निरुपयोगी, दुरुस्त न होणाऱ्या शासकीय भांडार वस्तू, वाहने इत्यादींची जाहीर लिलावाने विक्री करण्याविषयी शासन निर्णय क्रमांक : जेईपी १०९६/सीआर- ३५८८/२६, दिनांक २२ नोव्हेंबर, २००० रोजी विहित पध्दती निश्चित केली आहे. या वस्तूंची या विभागाच्या २३ नोव्हेंबर, १९९० नुसार हातची किंमत (Upset Value) ठरवून त्यांचा लिलाव करण्याविषयी तत्वे निश्चित केली आहेत. तथापि, Upset Value पेक्षा लिलावात कमी किंमत आल्यास करावयाच्या कार्यवाहीबाबत संदिग्धता होती.

२. अशा परिस्थितीत पुन्हा लिलाव बोलवावा किंवा कसे ? किती वेळा लिलाव बोलवावा ? मागील वेळीपेक्षा पुढील लिलावात कमी किंमत आल्यास काय करावे ? लिलावाची प्रक्रिया किती कालावधीत पूर्ण करावी ? या सर्व बाबींविषयी स्पष्ट निर्देश नसल्याने लिलावाच्या प्रक्रियेत संदिग्धता होती.

३. परिणामी, लिलावाची प्रक्रिया वेळेत पूर्ण न झाल्यामुळे वाहने, यंत्रसामुग्री खराब होते आणि गंजून जाते. पुढील लिलावात त्यांची किंमत आणखी कमी होऊन शासनाचे आर्थिक नुकसान होते. हे टाळण्यासाठी लिलावामध्ये Upset Value पेक्षा कमी किंमत आल्यास पुढीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

४. **Upset Value पेक्षा लिलावात कमी किंमत आली असता करावयाची कार्यवाही :-**

i) पहिल्या लिलावानंतर एक महिन्याच्या अंतराने पुन्हा दुसरा लिलाव घेण्यात यावा.

ii) दुसऱ्या लिलावात Upset Value पेक्षा जास्त किंमत आल्यास वस्तूंचे निर्लेखन करण्यात यावे. तथापि, कमी किंमत आल्यास लगेच तिसरा लिलाव करावा.

iii) तिसऱ्या लिलावातसुध्दा Upset Value पेक्षा कमी किंमत आल्यास सर्वाधिक बोली करणाऱ्या व्यक्तीस या वस्तूंची विक्री करण्यात येईल. मात्र यासाठी जिल्हा परिषदेच्या सर्वसाधारण सभेची मान्यता आवश्यक आहे.

iv) ही संपूर्ण कार्यवाही पहिल्या लिलावानंतर जास्तीत जास्त तीन महिन्यात पूर्ण करावयाची जबाबदारी प्रशासकीय प्रमुखांची म्हणजे मुख्य कार्यकारी अधिकारी यांची राहील.

v) दिनांक २२ नोव्हेंबर, २००० च्या शासन निर्णयानुसार यासाठी गठीत करण्यात आलेल्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली समितीस याविषयी प्रदान करण्यात आलेले अधिकार कायम राहतील.

vi) वाहन/यंत्रसामुग्रीचे निर्लेखन ज्या आर्थिक वर्षात करणे आवश्यक आहे, त्याच आर्थिक वर्षात निर्लेखन झाले पाहिजे. हे तपासण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी यांची राहील.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक **२००९०७२२१५५०४१००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( डॉ. प्रशांत रसाळ )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) विभागीय आयुक्त (सर्व).
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).
३) निवड नस्ती, कार्यासन क्र.पंरा-१, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.